


# कामकंदला नाटक



अथवा

## कामसेन राजाचा वध.

---

हें

नवीन पुस्तक

केवळ लोकरंजनार्थ



एकनाथ गणेश भांडारे, उंब्रजकर,

तालुका जुन्नर, जिल्हा पुणें,

ह्यांनीं रचिलें.



किंमत सव्वा रुपया.



जूलै १८८१.

## माझ्या त्रिवर्ग ज्येष्ठ बंधूंस प्रार्थना.

---

[ अभंग ]

बांधवहो तुह्मां ॥ नमितों मी आतां ॥
आहां मज ताता ॥ सम तुम्ही ॥ १ ॥
राय दामोदरा ॥ वासुदेव पंत ॥
वामन, पतीत ॥ प्रार्थितों मी ॥ २ ॥
अज्ञानें रचीला ॥ सज्ञानें हो ग्रंथ ॥
पाहुनये पंथ ॥ वास्तवीक ॥ ३ ॥
दोषयुक्त ग्रंथ ॥ नाहिं जरी पंथ ॥
हवा तसा, पंत ॥ बांधवांनो ॥ ४ ॥
वाचणें संतोषें ॥ व्हावें आनंदी हो ॥
प्रार्थीत हाहो ॥ एकनाथ ॥ ५ ॥

ग्रंथकर्ता.

## प्रीयवाचकांस प्रार्थना.

---

### गीति.

विद्वज्जनहो परिसा, प्रार्थितसें मी तुम्हांस गुणवंतां ॥
वाचुन विज्ञप्ती ही, लक्ष न द्यावें कुदोष सांपडतां ॥ १ ॥
रचण्या पुस्तक व्हावा, नाहीं जनहो, तसा मला पंथ ॥
माहित, रचिला मी हा, अज्ञानें, वाचणें, असा ग्रंथ ॥ २ ॥
दोषानें भरलेलें, पुस्तक आहे तरी सुवाचक हो ॥
न करा अव्हेर याचा, प्रार्थीतों पाहणें गुणादिक हो ॥ ३ ॥

### हिंदी.

विद्वज्जनहो आपुला धर्म हाच ॥
लोप करणें दुर्गुणांचा तसाच ॥
प्रकट करणें थोडक्या गुणां पाही ॥
जरी असले चांगले ते जनांहीं ॥ ४ ॥

ग्रंथकर्ता.

---

## प्रस्तावना.

सुमारें पाऊणशें वर्षांपासून इंग्लिशलोकांनीं सर्व हिंदुस्थानभर अनेक प्रकारच्या शाळा स्थापित केल्यामुळें एतद्देशीयलोकांस पुष्कळ प्रकारचे लाभ होतात आणि झालेही आहेत. शस्त्रांत पाशुपत, तद्वत् वरील लाभांत विद्या हा मोठा लाभ होय. विद्या शिकल्यापासून मनुष्य सदाचारी, स्वार्थी तर असतोच परंतु परमार्थी, उपदेशक, निराभिमानी, स्वस्त्रीरत, स्वकुटुंबपोषणीय, व प्रियंकर, वगैरे पुष्कळ सगुणयुक्त होतो, हें बहुधा सर्वांस विदितच आहे; परंतु जर तो मनुष्य, विद्वान असो, अथवा मूर्ख असो, एकदां वेश्येच्या नादीं लागला कीं, वरील विशेषणांवर पाटावरवंटा पडलाच ! ! यास्तव एतन्निवारणार्थ मी आपल्या अल्पमतीनुसार हें लहानसें पुस्तक रचून प्रीयवाचकांसमोर ठेविलें आहे.

आतां ह्यांत वेश्येच्या नादीं लागल्यामुळें प्राप्त झालेल्या भयंकर परिणामांचे स्पष्टरीत्या दिग्दर्शन करून, परपुरुष अथवा परकामिनीवर पापवासना धारण करण्याचे चांगले अथवा वाईट परिणाम, स्त्रीसाहस, स्त्रीचातुर्य, वचन जास्त किंवा प्राण जास्ती ? धन, स्त्री, आणि प्रीति ह्यांमध्यें श्रेष्ठ कोण ? पुरुषाचें खरें धाडस, मित्रलाभ, वगैरे पुष्कळ उत्तमोत्तम गोष्टी सिद्ध करण्याचा बराच खटाटोप केला आहे. सदर्हू वर लिहिलेल्या गोष्टी

कितपत सिद्ध झाल्या आहेत, हें पहाणें मर्मज्ञ व रसज्ञ वाचकांकडेस आहे. सरतेशेवटीं आर्यवाचकांस माझी इतकीच विनंती आहे कीं, मी अविद्वान् ह्मणून दोषांकडे लक्ष न देतां गुणांचें आपण सर्वांनीं ग्राहक व्हावें; तरी हें पुस्तक वाचून वाचकांचें जेव्हां चांगलें मनरंजन होईल तेव्हांच मी कृतकृत्य झालों असें समजेन.

एकनाथ गणेश भांडारे,

ग्रंथकर्ता.

मुक्काम जबलपूर, ता. १ एप्रिल सन १८८१ इसवी.

# कामकंदला नाटक
## अथवा
# कामसेन राजाचा वध



मंगलाचरण.

श्लोक.

शार्दूलविक्रीडित.

श्रीमन्मंगल मोरया नमितसें मी दीन आतां तरी
संतोषें मजला करी अभयसा वारीं कुविघ्नें त्वरी
पायीं नूपुर वाजती रुणझुणा विद्या दयासागरा।
हेरंबा सुखदायका मजप्रती देईं विभो तूं वरा।

शिखरिणी.

वरा देईं मातें मयुरवहने ब्रह्मकुमरी॥
नको अंतां पाहूं, मतिहिन असें मी तवकरीं।
नसे ठावा मातें, तुजविण अता पादकमलां
नमूं तूंतें, दासा, करि अभयसा पाव मजला॥२॥

(तदनंतर सूत्रधार प्रवेश करितो, आणि ईश्वरभजनीं निमग्न असतां अकस्मात् विदूषक प्रवेश करून ह्मणतो.)

काय करावें? घरच्या भयें घेतलें रान, रस्त्यामध्यें लागली तहान, बागीं केलें आपपान, मालकें धरिली तेथें मान, भयें पळालों तुझीच आण, येथें आलों तों हे सान,

थोर मंडळी करिती गान; खरोखर याच्यायोगें माझें कपाळ उठलें. (सूत्रधारास हात जोडून) बाबारे, मी तुझ्या पायां पडतों. हे तुंन् तुंन्, कडं कडं, फैं फैं घटकाभर बंद कर आणि हें तूं काय आरंभिलेंस तें मला कथन कर.

सूत्रधार–(आश्चर्यानें मनांत म्हणतो) काय चमत्कार आहे ! चौऱ्यायशीलक्ष योनी फिराव्या तेव्हां कोठें एकदां नरदेह प्राप्त होणार; आणि याच जन्मामध्यें काय तें हरीस्मरण करून, संसारपार करून, स्वर्गसुख घेण्यास जावें, तों हा आपला प्रति झोटिंग येथें प्राप्त झाला आहे! अस्तु, याचें नांव आधीं विचारावें म्हणजे झालें. (उघड) अहो सद्गृहस्थ, आपलें नामाभिदान प्रथमतः कथन करावंत.

विदूषक–ओ यस्, मलाही तोच संशय होता. कारण येथें शुद्ध कोरडी ज़मीन असतां नांवेचें प्रयोजन काय? जीव देणें झालें तर संध्येच्या पळीभर सुद्धां पाणी नाहीं. (टाळ्या वाजवून) आणि आम्हास नांव आणण्यास सांगतात. कसे साळसूद गृहस्थ आहेत पहा !!

सूत्रधार–आपण तर खूब विद्वान् दिसतां! किती वेद आपण पठण केलेत तें तर ऐकूं द्या.

विदूषक–हम चार बेद पढा है. वन्, टू, थ्री, फोर. षड्शास्त्र, वकट, लेंड, मूंड, नाल, आर, वैद आणि सातवा तुझ्यावर झक्. संध्याकर्म, आपोहिष्ट, काका पुष्ट, मामा तेली, संध्या झाली; आग

बायको, जेवण्यास वाढ, नाहीं तर कोतवालाज- वळ चाल!

सूत्रधार—वः काय गोष्ट आपली !! खूबच वेदांत केलात. असो, आतां कृपा करून आपणास कोण्या नांवानें हाक मारतात, तें सांगा.

विदूषक—अहो—

सूत्रधार—( विदूषकास हाक मारतो ) अहो ?

विदूषक—कांहो, ( हंसतो ). आमचें खरें नांव आजी आहे. हांक मारा पाहूं.

सूत्रधार—फार उत्तम आहे. अहो आजी ?

विदूषक—काय म्हणतां हो पाजी ?

सूत्रधार—बाबारे, फार चावटपणा उपयोगाचा नाहीं. रात्र फार झाहली आहे. आपण उभयतां मिळून येथें एक अत्युत्तम नवरसांनीं युक्त असें नाटक ह्या विद्व- ज्जनांसन्मुख करूं. जर तूं कथन करून मला या सुस्थळीं मदत देशील तर फार उत्तम आहे.

विदूषक—( कपाळावर हात मारून ) आपण [illegible] मदत पीत असतां वाटतं. माय डियर, [illegible] सो. तुझी शपत, मजजवळ वन् पाईस सु[illegible]

सूत्रधार—शाबास, शाबास. मला कांहीं ती मदत नको, उत्तम प्रकारें साह्य कर. परंतु प्रथमतः नामाभि- दान कथन कर.

विदूषक—ऐका आतां: मला चौघे बंधू; विक्रमशक, शा- लिवाहनशक, इंग्लिशशक, आणि बेलाशक असे आम्ही चौघे भाऊ, त्यांतला पांचामणाचा भात खाऊ

मी विदूषक होय. माझें नांव विदूषक. समजलां ? पण कांहो, मला येथें कैदेंत टाकून आपणास पळून जायचें आहे वाटतें.

**सूत्रधार**—नाहीं बाबा, माझें नांव सूत्रधार.

**विदूषक**—अरे बापरे !! आजपर्यंत मीं पुष्कळ पातळ पदार्थांनां धार पाहिली, परंतु सुताला कधीं नाहीं पाहिली ! मला वाटतें सू च्या ठिकाणीं मू घातला तर चांगलें शुद्ध होईल. कारण त्याला खूब जाडी धार असते !!

**सूत्रधार**—मला **नाटकाचार्यही** म्हणतात. विद्वज्जनांच्या मनरंजनार्थ मी तुझ्या साह्यानें "**कामकंदला**" नामक नाटक करून दाखविणार आहें. यामध्यें शृंगार, वीर, करुणा, रौद्र, अद्भुत, भयानक, हास्य, बीभत्स आणि शांती हे नऊ रस आहेत.

**विदूषक**—कांहो मिस्तर सूत्रधार, असें हें उत्तम नाटक कोणी केलें आहे, तें तर ऐकूंद्या, व ह्याचा थोडासा कथाभागही कथन करा.

**सूत्रधार**—मित्रा विदूषका, ऐक; विद्वज्जनहो, श्रवण करा; भांडारकुलामध्यें उत्पन्न झालेले उंब्रजस्थ **गणेशपंत** त्यांचा पुत्र **एकनाथ** त्यानें हें '**कामकंदला**' नाटक रचिलें आहे. कोणी **माधव** नामक ब्राह्मणाची, **कामकंदला** नामक वेश्येशीं, व **कामकंदलेची माधवा** बरोबर प्रीति कशी जडली? त्यांचीं शृंगारिक भाषणें, उभयतांचा संयोग, पुनः दुर्दैवेंकरून वियोग, **कामकंदलेचा** विरह, **कामसेन** नामकराजाचा वध, वगैरे कथानक आहे,

तें नाटकरीत्या विद्वज्जनांच्या दृष्टोत्पत्तीस येईलच. ( इतक्यांत पडद्यापलीकडे मोठ्यानें शब्द होतो तें ऐकून विदूषक सूत्रधाराप्रत भिऊन म्हणतो. )

**विदूषक**–मिसेस सूत्रधार, मला तर बुवा भीति वाटते. मी आपला पळून येके ठिकाणीं लपून बसतों. ( जातो ).

( दोघेही गमन करितात. )

पडदा पडतो.

( ही कथेची प्रस्तावना झाली. )

---

## प्रवेश १ ला.

स्थल–अरण्य.

पात्रें.

माधव..................ब्राह्मणपुत्र.
विदूषक...............सूत्रधाराचा मित्र.

( तदनंतर माधव गंधर्वारण्याचे ठाईं प्रवेश करून म्हणतो. )

माधव.–( मनांत ) आज मला घर सोडून बरोबर एक वर्ष होत आलें. गरीबीमुळें पित्यानें मला " देशाटण करून द्रव्य मिळवून आण " म्हणून सांगितलें, परंतु माझें प्रालब्धच पहा कसें हात धुवून मागें लागलें आहे. आज एक वर्ष झालें थोडे कां राजे धुंडले ? परंतु उपयोग काय ? आपल्या प्रालब्धींच नसलें तर ते तरी कोठून देतील? असो, नशीब माझें. पहा ज्या गुणेंकरून मनुष्य चांगला दिसतो तोच गूण कांहीं कालांतरेंकरून अयोग्यतेस पात्र होतो. आजपर्यंत ज्या ज्या राजेरजवाड्यांच्या येथें राहिलों त्या त्या लोकांनीं, माझें मदनाहीपेक्षां उत्तम प्रकारचें स्वरूप पाहून, मला वाटे लाविलें! बरोबरच आहे. कारण ते माझें हें सुंदर स्वरूप पाहूनच मला राहूं देण्यास साशंकित झाले असतील. एकूण द्रव्यहानी, मानहानी, उदासीनता आणि चिंता इतक्यांस ही सुंदरताच स्पद झा-

ली, काय ! परमेश्वरा, आतां जर ह्या तोंडानें मी घरीं गेलों तर पिता मला काय म्हणेल ? " इतक्या दिवस मी मेहनत घेऊन जें यास शिकविलें तें सर्व व्यर्थ जाण्याकरतां कीं काय ? जसा गेला तसा हात हालवीत आला." असें बोलणें ज्यापेक्षां निमुटपणें कर्णद्वारांनीं ऐकावें, त्यापेक्षां आतां घरींच जाऊं नये, हें सर्वस्वी उत्तम. मग पुढें जें कांहीं होणें असेल तें होईल.

साकी.

**वदुनी माधव ऐसें मनिं हो, गमना करि आणीक ॥**
**इतुक्यामध्यें आरण्यातें, पाहुनि बोले देख ॥ १ ॥**

( उभा राहून उघड रीतीनें म्हणतो. ) अहाहा ! काय ह्या अरंण्याचें वर्णन करावें, कीं ज्यामध्यें कोट्यावधी वृक्ष गगनचुंबित गेले आहेत. यामुळें असें वाटतें कीं, ह्या निराधार आकाशानें भूतलाप्रत पतन न व्हावें एतदर्थच आपल्या पराक्रमेंकरून त्यास सावरून धरे-तात कीं काय ! तसेंच छायेकडे पाहिलें असतां असा भास व्हावा कीं, सूर्यकीरणरूपीं आकाशामध्यें छायारूपीढगेंच दिसतात कीं काय ! किती लंरी देखावा उत्तम हा ! ! खरोखर जरी कोणी एखादा दुःखी प्राणी येथें प्राप्त झाला तरी त्यास घटकाभर आनंद झाल्यावांचून राहणेंच नाहीं. फार तर काय, ह्या वसंतऋतुच्या योगानें वृक्षांस नूतनं पल्लव फुटल्या-मुळें चहूंकडे सुगंध सुटला आहे, आणि त्यामुळें प्रत्यक्ष स्वर्गीय गंधर्वही आपला मार्ग चुकून येथें येत

असल्यास नवल नाहीं ! ( उभा राहून ) वाहवा ! अशी अद्वितीय शोभा म्यां कधींच पाहिली नसल्यामुळें माझा तर्क अगदीं गर्क झाला आहे. पण येवढेंही असून अशा सुस्थलीं कोणी मनुष्य नाहीं, तेव्हां हें लहानका आश्चर्य !! ( वृक्षा आडून शब्द होतो ).

" कौन है ? पकडके कैद करुंगा, जलदी जाव यहांसे. "

**माधव.**–मी माधव नामाचा ब्राम्हण देशाटण करीत करीत घटकाभर येथें विसावा घेण्यास्तव ह्या आम्रवृक्षाखालीं बसत आहें.

**विदूषक**–( बाहेर येऊन ) यहां बैठनेकेवास्ते तुमने किसका हुकूम लिया था ? मालूम नहीं मैं कौन हूं ?

**माधव.**–( त्याचा चेहरा भित्रा पाहून ) अरे हो, आहे माहित तूं कोण आहेस तें. जास्त बोलशील तर मार खाशील.

**विदूषक**–( पायां पडून ) नाहीं मी चुकलों. माझ्या गंगाभागिर्थी सख्या बायकोस चुडेदान दे, आणि जें तूं सांगशील तें मी ऐकेन.

**माधव.**–असा जरा ताळ्यावर ये थोडा. ( त्याच्याजवळ जाऊन ) कांरे, माझें काम ऐकशील ना ?

**विदूषक**–हो ऐकेन.

**माधव.**–(बोट दाखवून) हा रस्ता जो ह्या अरंण्यांतून गेला आहे तो कोठें जातो, आणि तेथें कोणता राजा राज्य करीत असून त्याची वर्तणूक कशी काय आहे वगैरे सर्व कथन कर.

**विदूषक**–( बोट दाखवून ) हा रस्ता नीट तुझ्या नाकासमोर

देवनगरी म्हणून एक नगर आहे [illegible] कामसेन नामक राजा राज्य करीत असतो. ही स्वारी मोठी शौकीन आहे. असें तुह्मी नीट चालले जा.

**माधव.**–फार उत्तम आहे. (जातो व पुनः माघारी येऊन) कांहो पण गृहस्थ, तुमचें नांव काय हो ?

**विदूषक**–आमचें नांव ? आमचें नांव "रावबहादूर विदूषक पंत फाकडेसिंग जमादार."

**माधव.**–बरें आहे. (लवून) नमस्कार आतां.

**विदूषक**–गुड नाईट.

(गमन करितात.)

(पडदा पडतो.)

---

## प्रवेश २ रा.

### देवनगरी–राजसभा.

पात्रें.

कामसेन..........देवनगरीचा राजा.
चंद्रचूड...........त्याचा प्रधान.
वीरबाहू............सेनापती.
कामकंदला .......वेश्या.
माधव..............ब्राम्हणपुत्र.
जयसिंग....... ....राजसेवक.
विलासखां .........तबलची.
शामराजपंत.......२ रा तबलची.

( सर्व सभा घनदाट बसली आहे तों कामसेन राजा येऊन सिंहासन सुशोभित करतो आणि प्रधानास म्हणतो )

कामसेन–प्रधानजी, राज्याचा बंदोबस्त कसा काय ठेविला आहांत, आजकाल प्रजा तर सुखांत असते ना ?

चंद्रचूड–( हात जोडून ) सरकार, आपण राज्यप्रकरणीं बिलकुल काळजी करूं नये. माझ्यासारखा आपल्या पदरीं प्रधान असतांना, राज्यप्रकरणीं तिळभर तरी न्युन्यता पडेल कीं काय ? कधीं नाहीं. सरकार, ज्या प्रमाणें एखादी अबला आपल्या पोटच्या लेकराचें

प्रेमपूर्वक पालन पोषण करिले, तद्वत् मी आपल्या कृपावलोकनेंकरून प्रजापालन करीत आहें. पर्जन्याचा सुकाळ असल्यामुळें सर्व प्रकारचीं धान्येंही विपुल आहेत. दुसरें महाराजांच्या दराऱ्यामुळें, दुष्ट, हिंसकादिकांनीं देशांतरास पलायन केलें. राजधुरंधरांच्या आज्ञानुसार गुन्हेगारांस योग्य शिक्षा देववितों. तसेंच कापट्यवेषधारीसाधुलोकांस आणि स्त्रीलंपटांस तर राज्यप्रवेशण्यास सुद्धां हुकूम नाहीं. सारांश, जगंत्सर्गसंहारकारकाच्या कृपेनें व आपल्या पराक्रमानें सर्व राष्ट्रांतील लोक आनंदसागरांत वास करीत आहेत.

**कामसेन**–( संतोषानें ) शाबास, प्रधानजी शाबास. प्रधान असावे तर आपल्यासारखेच. प्रधानजी, मी मनःपूर्वक सांगतों कीं, आपण ह्या [ हृदयावर हस्त ठेऊन ] **कामसेनाच्या** राज्यांत आहांत म्हणूनच हें राज्य उत्तमप्रकारें चालत असून त्याची कीर्ति दिग्मंडळापर्यंत पसरली आहे. वास्तवीक मीं सांगतों कीं, आपली तोंडावर स्तुती करावी असें नाहीं, परंतु आपल्यासारखा सूज्ञ, नीतिज्ञ, सर्वज्ञ, बुद्धिमान व शूर प्रधान अद्याप एकही पाहण्यांत तर काय, परंतु ऐकण्यांतही नाहीं आला. राजा काय तो सिंहासनाचा मात्र अधिकारी, परंतु सर्व राज्यकारभार प्रधानावरच अवलंबून असतो. सारांश, षड्गुणेश्वर जो करुणाकर दीनवत्सल त्यापाशीं माझें करद्वय जोडून इतकेंच मागणें आहे कीं, यांना तूं कृपावलोकनेंकरून शतायुषी कर आणि माझ्या राज्याचेंही वैभव उत्कर्षतेस पावीव म्हणजे झालें.

चंद्रचूड–सरकार, आतां या दासाची कितपत स्तुती करणार. वास्तवीक इतकी माझी योग्यताच नव्हे. कारणः—

श्लोक.

राज्ञि धर्माणि धर्मिष्ठाः पापेपापाः समे समाः ॥
प्रजास्तदनुवर्तंते, यथा राजा तथा प्रजाः ॥ १ ॥

अर्थ–ज्या प्रमाणें राजाची वर्तणूक असते तद्वत विशेषें करून प्रजेचीही असते. आणखीं, जर राजा धर्मात्मा असला तर प्रजाही धर्मात्मी होईल. आणि राजाच जर मध्यम, तर प्रजाही तद्वतच समजली पाहिजे. तर, हे राजोत्तमा, वर सांगितलेल्या सर्व कारणांस राजाच मूळ होय. आपल्यापुढें ह्या दासाची आतां कितपत योग्यता आहे हें या श्लोकावरून महाराजांच्या लक्षांत पूर्णपणें येईलच.

कामसेन–सत्य होय प्रधानजी. कारण ज्यावेळेस मी लहानपणीं गुरुजींजवळ राजनीति शिकत असें त्यावेळेस वारंवार गुरुजींनीं मला याप्रमाणें बोधपर श्लोक सांगून त्यांचा अर्थ अक्षरशः मनांत ठसवीत जावा. पहा, जो राजा सदाचरणी असतो, त्याची प्रजा तशीच. आणि दुराचारी असतो, त्याचीही विशेषेंकरून तशीच. वरच्या वाक्यास प्रमाण प्रधानजींनी म्हटलें तें होय व दुसऱ्या वाक्यास हें प्रमाणः—

श्लोक.

सिंहरूपेण राजानो, व्याघ्ररूपेण मंत्रिणः ॥
भृत्याश्च गृध्ररूपेण, क्षयं यास्यंति वै प्रजाः ॥ २ ॥

अर्थ-राजाच जर सिंहरूपी असला तर त्याचे प्रधान व्याघ्र होत. भृत्यादिक गीध, प्रजा निर्बल असते. आणि जर नृपती सदाचारी असला तर सर्व आप-आपल्या मर्यादेनें असतात. आणि तोच जर तसा न-सला तर प्रत्यक्ष त्याचे आप्तच त्याचा नाश करण्यास भीत नाहींत. उदाहरणार्थ पहा, प्राचीनकाळीं पृथ्वीवर प्रबळ असा राजा कुरुवंशीं दुर्योधन होता. त्याचे सापत्न बंधू पांडव हे होत. दुर्योधन हा फार कुव्यसनी व दुराचारी असल्याकारणानें त्याचे प्रधान दुःशासन कर्णादिक त्याच वळणावर गेले. आणि पांडवांत धर्म-राज हा फार सद्गुणी असल्या कारणानें त्याचेही प्रधान भीमादिक त्याच पंथें जाते झाले. होतां होतां अंतीं प्रत्यक्ष त्याचे सापत्न बंधू पांडव यांच्याच हस्तें दुर्योधन सर्वांसह नाशास पात्र झाला. सारांश राजा जर चांगला असला तर त्याची प्रजाही चांगली असते. ह्यावरून प्रधान राजापेक्षां कमी योग्यतेस पात्र आहे हें सिद्ध झालें. प्रधानजी, बरोबर आहे. आपण म्हटलें तेंच सत्य होय. असो, (सेनापतीकडे पाहून) सेनापते, सैन्याची संख्या व बंदोबस्त कसा काय आहे? वगैरे कथन करावें.

वीरबाहू-(हस्तजोडून) भूपते, ईश्वरकृपेनें आजकाल आपल्याजवळ प्रमुख असे २०० सरदार आहेत. प्रत्येक सरदार असा पराक्रमी आहे कीं, समोर जरी प्रत्यक्ष महाकाळ येऊन युद्ध करण्यास सिद्ध होईल तरी तो रण करण्यास मागें पुढें पाहणार नाहीं. अशा

प्रत्येक सरदाराजवळ शंभर अतिरथी, दोनशें महारथी, चारशें रथी, सोळा हजार घोडेस्वार आणि पायदळाची संख्या वर्णन करण्यास तर मी अशक्य आहें. सारांश, आकाशांत एकवेळ तारांगणांची गणना लागेल, परंतु आपल्या सैन्याची गणना लागणें नाहीं. परशत्रू ह्मणजे सिंहापुढें जंबूक, किंवा सूर्यासमोर खद्योत, तद्वत् होय. ईश्वर इच्छेंकरून तोही देखावा केधींनाकधीं तरी दृष्टोत्पत्तीस येईलच.

**कामसेन**—शाबास सेनापते शाबास. सांप्रतकालीं राज्यव्यवस्था तर उत्तम ठेविली खरी, परंतु ( चंद्रचूडाकडे पाहून ) प्रधानजी, यंदां **विक्रमास** राज्यकरभार दिला आहां किंवा कसें ?

**चंद्रचूड**—हे नृपचूडामणे, ह्या वर्षीं **विक्रमास** राज्यकरभार नाहीं देऊं शकलों, कारण सुमारें चार महिने झाले **शिरबाहूनें** सांगितलें कीं, 'आजकाल फौजेची संख्या फारच वाढत चालली आहे, ह्याकरितां ह्या सालीं जितका पैसा तिजोरींत होता तितका सर्व याच पाईं खलास झाला. पुढच्या सालीं, सरकार, पहातां येईल.

**कामसेन**—अरेरे, प्रधानजी, हें तर तुम्हीं चांगलें कृत्य केलें नाहीं. कारण ह्या भूमंडळावर सार्वभौम तोच असून त्याच्या मर्जीविरुद्ध हें कर्म केलेंत, तर कदाचित् त्यास राग येऊन तो युद्धास उभा राहील; याला मात्र तुम्ही पूर्णपणें विचार करा.

**सर्व**—महाराज, तसाच जर प्रसंग आला तर पहातां येईल. सरकारास काळजी करणें नलगे.

**कामसेन**–अस्तु. प्रधानजी, घटकाभर मनरंजनार्थ आपल्या **कामकंदलेस** गाण्याकरितां तर हाक मारा पाहूं.

**चंद्रचूड**–( हात जोडून ) आज्ञा सरकार. [ इकडे तिकडे पाहून ] कोण आहेरे येथें ? **जयसींग** ?

**जयसींग**– [ हात जोडून ] हुकूम सरकार.

**चंद्रचूड**–जा त्या **कामकंदलेस** गाण्याकरतां घेऊन ये.

**जयसींग**– बहोत अच्छा महाराज.

**चंद्रचूड**–जा तर लौकर जा.

[ तो जातो व तीस घेऊन येतो. ]

**कामसेन**–[ तीस पाहून हर्षानें. ]

कटाव.

वेश्या भा पाहुनी बोले, कामसेन हर्षें डोले ॥ धृ० ॥
जिकडे तिकडे प्रभा फांकली, वाटे विद्युलता पातली,
छुम छुम छुम छुम नेपुर वाजे, पायीं पैंजण वाळे साजे,
पीतांबर तो अमदाबाजी, लाल दुपट्टा सांवरि काजी,
अंगामध्यें शोभत चोळी, उरोजभारें लवे मराठी,
चंद्रहार गळसऱ्यादीकतें, अलंकारें माच भासये,
मुखाब्जीं हो विडा रंगला, सभेंत येतां चंद्रभासला,
मृगही भ्याला कमल लोचना, गजही लाजे पाहुंनि गमना, उपमा साजे सुलोचनेची, प्रति अंगना रमावराची, केली आराधना शिवाची, तरी न पावे प्रतीइयेची, भ्रुकुटी भासे धनू रेखिलें, विशाल भाळीं कुंकु चर्चिलें, विधात्यानें रचिली लीलें, चित्र हें केलें, बहुत चांगलें, मन हें रमलें, चित्तही भ्रमलें ॥ वेश्या भा पाहुनी बोले, कामसेन हर्षें डोले ॥ १ ॥

**कामकंदला**–[ नम्रतेनें ] राजाधिराज, चरणाप्रत वंदन करतें.

**कामसेन**–कल्याण होवो. कामकंदले, त्वां आतां गाण्यास आरंभ करून सर्व सभासदांस फार प्रसन्न करावेंस.

**कामकंदला**–फार उत्तम आहे. ( गाऊं लागते. )

राग यमन कल्याण.

दीम दीम तना, रे, दीम दीम तना, तना, नादरदरतन-त्रों, त्रों तनना, तनदरन, दीम दीम तना, तन दर-न दीम दीम तना, तनदरना, तनदरना, तनदरना, ( २ )नित नित ना, तनात्रों, त्रोंतनन, तनदरन, तनदर-न, तदार तारे दानी, नादर दर तना, त्रों, त्रों तननं, तनदरन, दीम दीम तना ॥ अंत्रा ॥ नारे नारे दिर दिर ताधीम, तर रितार, तर रितार, नित नित ना, तनात्रों, त्रोंतननें, तनदिरन, तनदरन तार तदार दानि, नादरदर तना, त्रों, त्रोंतननें, तनदरन, दीम दीम-तना ॥१॥

( इतक्यांत पडद्या पलीकडे शब्द होतो.

वेश्या तर काय ! परंतु गायन ऐकणारेही मूर्ख समजले पाहिजेत ( याप्रमाणें ३ वेळां शब्द होतो. )

**जयसिंग**–( कामसेनास हात जोडून विनंती करतो ) सरकार, अभी यह गाना बहोत अच्छा होके एक ब्राह्मन-का लडका, 'जिसकी उमर उनीस बीस बरसकी होगी, कहता है के वेश्या तो क्या लेकीन उसका गाना सुनने वाले भी मूर्ख समझना चाहिये." मैनें इसका कारन

बहोत दफे पुछा लेकिन वह बताता नहीं. सो मैने आपको विदित करदिया है.

**कामसेन**–( चंद्रचूडाकडे पाहून आश्चर्यानें ) प्रधानजी, **जयसींग** आतां काय बोलला तें आपण ऐकलें आहेच. ज्या अर्थीं त्या द्विजवरानें सर्वांनां मूर्ख ठरविलें, त्या अर्थीं ह्या गाण्यामध्यें कांहीं ना कांहीं तरी उणें असेलच व तो ब्राम्हणही विद्वान दिसत आहे. सबब त्यास येथें पाचारण केलें असतां सर्व खुलासेवार समजेल. बोलावा तर त्याला एकदां.

**चंद्रचूड**–( स्वत: त्याजवळ जाऊन ) हे द्विजोत्तमा, आपल्यास **कामसेन** महाराजांनीं परम आदरानें पाचारण केलें आहे तर कृपा करून तेथवर एकवेळ चलावें.

**माधव**–फार उत्तम आहे. ( राजाजवळ जातो. )

**कामसेन**–हे द्विजवरा, मी आपल्यास वंदन करितों. ( त्यास बस. )

**माधव**–( वर हात करून ) कल्याण होवो राजा कल्याण होवो. सिंव्हासनारूढ व्हावें.

**कामसेन**–( सिंहासनारूढ होऊन )

दिंडी.

**कामसेनें बसवून ब्राम्हणाला ॥**
**अलंकारादिक दिधलें. तयाला ॥**
**हस्त जोडोनी पुसे माधवातें ॥**
**कथी नामातें आणि उणें येथें ॥ १ ॥**

माधव—हे भूपते! गंधर्वपुरी हें माझें गांव असून माझें नाव माधव. आम्ही घरचे दरिद्री असल्यामुळें मी पित्याच्या आज्ञेवरून देशाटन करीत करीत तुझ्या नगराप्रत प्राप्त झालों, तों ( वेश्येकडे बोट दाखवून ) ह्या वेश्येचें गाणें ऐकूं आलें यामुळें मी घटका दोन घटका सभेबाहेर उभा राहिलों. सदहू ही स्त्रीही उत्तम गाते व हे राजा, सभासदही विद्वान आहेतसें दिसतें खरें, परंतु इतक्या अत्युत्तम थाटास एकच पदार्थ कमी असल्यामुळें भो राजन्, मला तसे कुशब्द उच्चारल्याशिवाय राहवलें नाहीं. आतां मला मोठा पस्तावा होत आहे.

कामसेन—माधवा, त्याबद्दल आपण बिलकूल मनांत न आणावें. परंतु किमर्थ आपण तशा शब्दांचा उच्चार केलात?

माधव—राजोत्तमा, ( कामकंदलेकडे बोट दाखवून ) इनें यमनकल्याण राग फार उत्तम प्रकारें गाइला, व ही गातेही उत्तम, परंतु तिचा पखवाज वाजविणारा चांगला असून चांगला नाहीं असें ह्मणण्यास चिंता नाहीं. कारण त्या वाजविणाऱ्या मनुष्यास अंगठा नाहीं, कसचा दुसऱ्या पदार्थाचा लाविला आहे असें दिसतें. ह्या कारणानें पखवाजावर थाप मारली असतां चांगली उठत नाहीं. परंतु हें एकाच्याही लक्षांत आलें नाहीं!!

कामकंदला—( त्याचें शहाणपण पाहून चकित होये व त्याच्या स्वरूपास मोहून मनांत ) अग बाई, किती

तरी शहाणपण हें !! इतके हे मेले मोठ मोठ्या मि-शांचे ताव घालून बसले आहेत, पण एकाच्या सुद्धां लक्षांत आलं नाहीं. तेव्हां अर्थातच यांना फार चांग-लं गातां येत असावं असं वाटतं. अहाहा ! स्वरूप तरी किती उत्तम आहे ! मदनाला सुद्धां या मनमो-हनावरून ओंवाळून सोडावा ! काय त्या भोंवया, काय तें पहाणं ! बोलणं तरी कसं स्पष्ट आणि कोम-ल ! शरीराचा बांधा तरी पहा किती उत्तम आहे ! खरोखर यांना रंभा सुद्धां मोहित झाल्या असल्यास नवल नाहीं! मी तर मग मानव जातीची असून अब-लाच आहें. हे जर माझ्या घरीं येतील तर माझ्या सारखी दैववान् मीच म्हटली पाहिजे. असं वाटतं कीं, एकदम ह्या जिवलगाच्या गळ्यांत मिठी मारावी. असो, प्रयत्न करून पाहीन. नंतर प्रालब्ध.

**कामसेन**–जयसींग, त्या पखवाज वाजविणाऱ्यास इकडे बोलाव पाहूं. ( **जयसिंग** त्यास राजाजवळ घेऊन येतो नंतर **कामसेन** म्हणतो ) तुझें नांव काय आहे ?

**विलासखां**–विलासखां.

**कामसेन**–काय, तुला अंगठा नाहीं ? व लावला आहे तो कोणत्या पदार्थाचा आहे ?

**विलासखां**–( हात जोडून ) सरकार, बराबर आज चार बरस भये मेरी अंगुठी तरवारसे टूटी है. तबसे मैंने आपना पेट भरनेके लिये मोमकी अंगूठी लगाई है. और वैसेही हाथसे मैं तबला बजाता हूं.

कामसेन—( माधवाकडे पाहून ) शाबास माधवा शाबास. धन्य आपलें चातुर्य ! (प्रधानाकडे पाहून, ) प्रधानजी, यांना आपण एक लक्ष रुपये आणि कांहीं वस्त्रालंकार बक्षीस देऊन आपल्या संग्रहीं ठेवावें. आणि या बिलासखांस दोनशें रुपये बक्षीस देऊन वंशपरंपरेनें चालू असा एक गांव द्यावा. आणि आपल्या शामराजपंतास पखवाज वाजविण्याकरतां बोलावूं पाठवा.

चंद्रचूड—( तसें करून ) जयसींग, लौकर जा आणि शामराजपंतास घेऊन ये.

( जयसींग त्यास घेऊन येतो. )

शामराजपंत—( हात वर करून ) राजाधिराजाचा जय जयकार असो.

कामसेन—पंत महाराज, माझ्या वचनास मान देऊन एक घटकाभर कामकंदले मागें पखवाज वाजवावा, अनमान करूं नये.

शामराजपंत—फार उत्तम आहे. आपली आज्ञा मला शिरसावंद्य आहे. ( पखवाज वाजविण्यास बसतो. )

कामसेन—कामकंदले, जितकी तुझ्यांत गाण्याची निपुणता असेल तितकी दाखवून माधवास तूं आज खुष करावेंस.

कामकंदला—फार उत्तम आहे. ( गाऊं लागते. )

तराना ( भूपकल्याण ).

नादरदर तुंदर दर दर दानि दोम ॥ ताना दिर दिरताना दीम. तननननननन, नादर दानि तुंदर दानि

तदीर तारे दीम, तॅना दिर दिर ताना दीम ताना दिर दिर ताना दीम ॥ नादर० ॥ १ ॥ अंत्रा ॥ दरन दरन दरन दीम तदीम दीम, धितुम् धित्तिलाना दिर दिर, ताना दिर दिर ताना दीम, तिरिकिट्टितक, धिरिकिट्टितक, धिरिकिट्ट धितूलाम धिरिकिट्टितकधा, तकिट धिधिकिट धिलांगधा, तकिट धिधिकिट धिलांगधा, तकिट धिधिकिट धिलांगधा, ॥ नादर० ॥ २ ॥

माधव–( मनांत ) अहाहा ! ! ही स्वर्गीची रंभा तर नाहीं ना ! किती तरी हा कंठ मधूर ! काय तें स्वरूप, काय तो आवाज, काय तें नाचणें ! शाबास कामकंदले शाबास. मला अभाग्यास अशी सुस्वरूपी व सुशिक्षित स्त्री कसली प्राप्त होणार ? वय सुद्धां इचें फार दिसत नाहीं. फार झालें तर १५ किंवा सोळा वर्षांचें असेल. आणि ह्या यौवनाच्या योगानें रूपास उपमा सुद्धां सांपडणें नाहीं. ज्यावेळेस आतां इनें उंच स्वराची तान घेतली त्यावेळेस असें वाटे कीं, इच्या सर्व सकुमार अंगांतलें यौवन इच्या गाण्यास मदत करण्याकरितां वर जात आहे कीं काय ? अहाहा ! अशी सुंदरी कोठेंच नसेल! परंतु आपल्यास काय उपयोग ? मनांत चुरमुरे खाणें व्यर्थ आहे. असो, ईश्वराची मर्जी. ( उघड ) शाबास वेश्ये शाबास. फार उत्तम गायन केलेंस. आजपर्यंत मी पुष्कळ देश हिंडलों, परंतु तुझ्यासारखें गायन कधीं ऐकिलें नाहीं. हें घे तुला बक्षीस. ( असें म्हणून ):–

( श्लोक कामदा )

वस्त्र भूषणें सर्व घेउनि ॥
माधवें दिलीं हंसि लागुनी ॥
कामसेन हें पाहतां म्हणे ॥
जाइजे गृहा माझिया म्हणें ॥ १ ॥

कामसेन–( माधवाकडे पाहून क्रोधाने ) हे विप्रा, तूं निमूटपणें चालला जा. नाहींतर ह्या भरसभेमध्यें फजीतीस मात्र पात्र होशील. आहांत आपण विद्वान खरे, परंतु आपली ह्या सभेंत रहाण्याची योग्यता नव्हे. व ह्याचें कारण मी सांगूं शकत नाहीं. ( प्रधानाकडे पाहून ) प्रधानजी, मघां मी तुमच्याच मुखानें ऐकलें कीं, दुराचारी, कापट्यवेषधारीसाधुलोकांस व स्त्रीलंपटांस राज्य सुद्धां प्रवेशण्यास हुकूम नाहीं तर मग हा स्त्रीलंपट कसा येथें येऊं शकला ? घालवा ह्यास सभेबाहेर. ह्यावेळेस- " तळची आग मस्तकांत गेली आहे. "

ओंवी.

राजाज्ञेस्तव प्रधानानें, सभेबाहेर घातिलें त्यानें ॥
माधव बोले सक्रोधानें, कामसेनास तेधवां ॥ १ ॥

माधव–( क्रोधानें ) हे कामसेना, तूं माझा या सभेंत अपमान केलास यास्तव तूं अल्प कालांतच मृत्यू पावशील. हाच माझा शाप तुला फळो.

जयसींग–( त्यास गचांडी देऊन ) चलवे, कहांका शाप यहां लगाया. ( माधव जातो ).

कामसेन—हे कामकंदले, जर मी तुझ्याबद्दल कांहीं वाईट ऐकिलें तर मग मात्र दूरवर विचार पहा म्हणजे झालें. जा तुम्ही घरीं ह्यावेळेस सर्व.

कामकंदला—( डोळ्यांत आंसवें आणून ) शिव ! शिव ! हे नारायणा ! बरं तुझी मर्जी !

( कामकंदला वाजविणाऱ्यांसह जाते. )

कामसेन—भालदार, कचेरी बरखास्त.

( सर्व जातात. )

( पडदा पडतो. )

## प्रवेश ३ रा.

---

### कामकंदलेचा महाल.

पात्रें

कामकंदला ..........वेश्या.

गिरजा...............कामकंदलेची दासी.

( तदनंतर कामकंदला दासीसह प्रवेश करिते. )

गिरजा–( हात जोडून ) बाईसाहेब, आतां रात्रीचे सुमारें १० वाजले. निजण्यास चलावें.

कामकंदला–( आंसवें आणून ) हर, हर, हे प्रभो! आतां मी कायरे करूं ? जेव्हां सभेबाहेर त्या दुष्टानें काढलें तेव्हां मनांत किती दुःखी झाले असतील ? परमेश्वरा, ह्या वेळेस स्वारी कुठं असेल ? गावांत राहण्यास तर मेल्यानें अडथळा घातला आहे ! रानांत रात्र फार झाल्यामुळें ह्या वसंतऋतूची गुलाबी थंडी मनमोहनास वाजत असेल नाहीं का ! प्राणसख्या, नकाहो ह्या दीन दासीचा आतां त्याग करून जाऊं ! अहो, पाण्या- वांचून जसा मासा तरफड तरफड करतो तसंच ह्यावेळीं मला होत आहे ! आपल्याला त्या भयंकर रानांत थंडी वाजत असेल खरी, परंतु आपल्या वियो- गानें ह्यावेळेस मला जी काय ऊणता होते त्याचें स्पष्टीकरण करण्यास मी असमर्थ आहें. अरे देवा, तुला कांहींच का ह्या दीन अबलेची दया

येत नाहीं ? हे विभो, नको [illegible] समज-
लास? जर ह्या **कामकंदला**रूपी च[illegible]पी
स्त्रायांबूची भेट करविशील तरच हा [illegible]
नाहींतर पुढचें भविष्य तूं जाणतच आहेस.
टाकून रडूं लागते ) शिव शिव हे **माधवा! माध**[illegible]
( मूर्छित होते. )

**गिरजा**–(घाबरून) अग बाई, हें काय झालं! (डोळ्यांस पाणी लावते व म्हणते) बाईसाहेब, अहो बाईसाहेब; अहो डोळे उघडा हो. ही पहा मी **गिरजा** जवळ आहे. उठा उठा, असं काय करतां.

**कामकंदला**– (किंचित् सावध होऊन) **गिरजा**, तूं कांहीं घाबरूं नको. मी शुद्धीवर आहे व मला कांहीं एक झालं नाहीं. परंतु आतां माझी अशी रोजच अवस्था होणार. शिव शिव **माधवा** ! बरं!

**गिरजा**–(गहिंवरून) बाईसाहेब, असं हो काय मेलं. अहो, डोळे तर उघडा. **माधव** तो कोण, व इतके शरीराला कष्ट कशाकरतां. मला तर बाई यांतलं कांहीं समजतच नाहीं. वास्तवीक मला जर हें वर्तमान अक्षरशः सांगाल तर मी कांहीं तरी उपाय करीन किंवा दुसरी एकादी युक्ती आपणास सांगून ती वस्तू आपल्या हस्तगत करून देईन. बर आधीं उठून तर बसा.

**कामकंदला**–(उठून बसते) दासी, काय सांगू ! मला **कामसेना**च गाण्याकरतां बोलावणं आलं होतं म्हणून मी सर्व वाजंत्रिणाऱ्यांसह गाण्याकरतां गेलें हें तर तुला

माहितच आहे. तेथें गेल्याबरोबर मी गाण्यास आरंभ केला. एक राग पुरा झाला किंवा नाहीं तों एक द्विज-पुत्र येऊन बोलला कीं, "वेश्या तर काय, परंतु गायन ऐकणारे सुद्धां मूर्ख समजले पाहिजेत." या प्रमाणें त्यानं तीनदां म्हटलं. नंतर त्या मेल्या जयसींग्यानं तें वर्तमान राजास सांगितलं. राजानं त्यांचा आदर सन्मान उत्तम रीतीनं करून त्यांना वस्त्र भूषणेंही दिलीं. कांहीं वेळानंतर राजानं तसं म्हणण्याचं कारण पुसलं. गिरजे, काय त्या तरुणपुरुषाच्या चातुर्याचं वर्णन करूं!! दासी, जसा तो पुरुष गुणानं तसा स्वरूपानंही उत्तम आहे. अहाहा!! काय त्या आत्मारामाचं वर्णन करूं! ज्या वेळेस त्यांनीं राजाशीं संभाषणें केलीं त्या वेळेस त्यांचे ते दंत प्रती कुंदच आहेत असें वाटे. आतां त्यांच्यावांचून हा महाल अगदीं स्मशानवत् भासत आहे. दासी, ह्या छपरी पलंगावर जी पुष्पशैया घातली आहेस ती मला खैराच्या निखाऱ्यांप्रमाणें भासत आहे आणि त्या योगें मला जी ऊष्णता होते ती माझी मीच जाणें! तसेच हे जे उत्तम प्रकारचे सुगंधित हार केलेस ते मला जीवलगाच्या वियोगानं सर्पाप्रमाणं भासतात. गिरजे, मी तुला फार शहाणी म्हणत होतें, परंतु वास्तवीक तुझ्यासारखी मूर्ख मी कोठेंही पाहिली नाहीं. कशी म्हणशील तर, अगे, ह्या वेळेस प्राणनाथ कोणत्या दुःखाकष्टांत असतील आणि ऱ्या चांडाळ-णीनं हे तूं केलेलें गोविंदाविडे पुढें ठेविले आहेत ते खवेत ना! वः काय गोष्ट तुझी! (विडे फेंकून देते)

अग, हे सुवर्णाचे रत्नजडीत अलंकार मी आपल्या कोमल अंगावर घातल्यामुळें, मला बाई, त्यांचं ओझं झालं आहे. काढ काढ लौकर काढ! (डागीने काढये) तसंच ह्या समयास माधवराव कोणत्या दुःखांत असतील आणि म्यां चांडाळणीनं पांचपेडी वेणी घालून बसावं काय ! ( श्वासोश्वास टाकून) शिव शिव नारायणा! सर्वस्वीं त्यांना त्या आडरानांत अशा भयंकर रात्रींच्या समयास रक्षण करणारा तूंच आहेस. (जरा थांबून) गिरजे, चल आपण त्यांच्या शोधास जाऊं. येतेसना? उठतर लौकर उठ. (उभी राहून जाऊं लागत्ये तों दासी तिच्या भरजरी पातळाचा पदर धरून बसविते आणि म्हणते.)

गिरजा–अहो, अंमळ थांबाल तर खरंः मीही येयेंच, परंतु पुढें काय झालं व इतका आपणास विरहानं त्रास कां दिला, काय त्या पुरुषाचें चातुर्य पाहून आपण त्यावर इतके भ्रमरी प्रमाणें मोहित झालां, वगैरे सर्व मला कृपा करून सांगा म्हणजे त्यांला मी, जरी ते पाताळांत गेले असतील तरी तेथून त्यांचा शोध लावून आपली व त्यांची भेट करवीन. व जर मीं हें असत्य भाषण करीत असेन तर माझ्या गळ्याचीच शपत. आपण कां इतके गांगारतां? या, बसा. (बसते.)

कामकंदला–आहाहा ! गिरजा, राजानं त्यांना तसा प्रश्न करतांच त्यांनीं, आपल्या बिलासखांस (तबलच्यास) मूळचा आंगठा नाहीं हें तर तुला माहितच आहे.

तर बाई सांगायचं कारण काय कीं, चतुरपणानें तें समजून कामसेनास सांगितलं! दासी, कामसेनासही मोठें सानंदाश्चर्य होऊन त्यानें चौकशीअंतीं पाहिलें तों तें खरंच! नंतर राजानं दुसरा तबलची आणवून मला पुन: उत्तम प्रकारें गाण्यास सांगितलं. मी मग भूपकल्याण राग गाइला. माझं गाणं ऐकल्यावर ते (माधव) फार प्रसन्न होऊन, त्यांनीं मला सर्व वस्त्र भूषणें (तीस दाखविते) दिलीं. हें राजानें पहातांच त्यांचा अपमान करून सभेबाहिर घालवून दिलं. मला बाई त्या वेळेस इतकं वाईट वाटलं कीं, सांगतां पुरवत नाहीं. राजानं माझ्याकडे पाहून मलासुद्धां जबरदस्त भीति घातली आहे. (डोळ्यांत आंसवें आणून) हर हर, म्या चांडाळणीनं तरी तीं वस्त्रभूषणें कशाला घ्यावींत? चहूंकडून मींच अभागीण, त्यांच्या क्लेशास, दु:खास, अपमानास कारण झालें काय? दासी, मनुष्याला सर्व दु:खें सहन होऊं शकतात, परंतु अपमानरूपी दु:ख सहन करणं म्हणजे औदुंबर पुष्पच समज. शिव शिव, हे भगवंता!! सर्व अपराध क्षमा करून प्राणनाथांची आणि माझी जर भेट आतां करविशील तर तुझे उपकार मी जन्मांतरींही विसरणार नाहीं. ह्या चांडाळणीची अक्कल कशी त्यावेळेस गुंग झाली होती कोण जाणं!! (दासीच्या गळ्यांत मोठ्या दु:खानें हात घालते व तिच्या गुडघ्यावर आपलें सकुमार मस्तक ठेऊन ढळढळां शोक करूं लागते) दासी, सर्वस्वीं माझे आईबाप तूंच आहेस. सर्व भरंवसा

**प्रकाश** : अरेरे, हा घोटाळा आहेच की ! काय हो मालतीबाई, आणखी कुणाच्या वाढदिवसाचं निमित्त नाही का मिळायचं ?

**मालती** : हो, तुमच्या आईच्या.

**प्रकाश** : अहो, म्हणजे वर्षातून एकूण फक्त दोनच दिवस झाले !

**मालती** : मग तुमच्या...तुमच्या भावाच्या...

**प्रकाश** : म्हणजे एकूण तीनच दिवस झाले !

[ दोघेहि स्तब्ध. ]

**प्रकाश** : मालती—

**मालती** : अं !

**प्रकाश** : माफ करा—पण खरंच रोज रोज तुमचं दर्शन व्हावं असं वाटतं. माझ्या आईला तर तुम्ही इतक्या आवडतां की, परवा ती म्हणाली, अगदी अशी सून हवी मला ! मालतीबाई, स्पष्ट बोलतों म्हणून माफ करा. खरंच आईच्या या सूचनेचा विचार करा. तुमच्या आईना विचारा. तुम्ही माझ्याशीं विवाह केलात तर मी स्वतःला भाग्यवान् समजेन. कशाची ददात ठेवणार नाही. सगळ्या हौशी पुरवीन तुमच्या. आमचा बंगला आहे—स्वतःची गाडी आहे—गडगंज पैसा आहे—अगदी फुलासारखं ठेवीन तुम्हांला —

[ प्रकाश हें सांगूं लागतो आणि मालतीचा चेहरा एकदम बदलतो. प्रथम तिचा कोंडमारा होत आहे. नंतर कांही तरी निश्चय ! ]

**प्रकाश** : विचार करा—खरंच विचार करा. म्हणजे माझी इंजिनियरिंगची परीक्षा झाली की लगेच —

**मालती** : प्रकाश, माफ करा. मला या गोष्टीचा विचार करतांच येणं शक्य नाही. आणि यापुढं आपल्या घरीं तर मुळीच येतां येणार नाही.

**प्रकाश** : पण—पण कां ?

**मालती** : तें मला सांगतां यायचं नाही. तुमचे आमचे संबंध अशक्य आहेत ! निदान या जन्मीं तरी अशक्य आहेत !

**प्रकाश** : माझं कांही चुकलं का ?

**मालती** : तुमचं कांहीच चुकलं नाही. चूक माझीच आहे.

**प्रकाश** : मला कांहीच उलगडा होत नाही.

तुझाच आहे. तूंच माझी त्यांची आतां भेट कर. प्रिये, जर तूं माझें हें दुर्घट कार्य साधून दिलंस तर मी जन्मोजन्मीं आभारी होईन. ( श्वास टाकून ) हर हर **माधवा ! माधवा !** कशी उभयतांची भेट होईल तो होवो. तुझ्या करतां हे पंचप्राण अगदीं तंगी लागले आहेत. ( रडूं लागते ).

**गिरजा**–( तिचे डोळे पुसून ) बाईसाहेब, उगी व्हा, असं काय करतां. अंमळ धीर धरा. मी त्यांची व आपली सूर्योदयापूर्वी भेट, खात्रीपूर्वक सांगतें, करवीन. या नंतर मग प्रालब्ध. पण प्रयत्न करून पाहीन.

**कामकंदला**–दासी, खरंच काय त्यांची भेट करवी-शील ? अहाहा ! असंच जर होईल तर माझ्यासारखी नशीबवान मीच म्हटली पाहिजे. **गिरजा**, उठ तर लौकर, जा आणि त्या मनमोहनास घेऊन ये.

**गिरजा**–ही पहा मी चाललें, पण कदाचित् जर त्यांची माझी गांठ पडली तर मी कांहीं त्यांनां पाहिलं तर नाहींच मग मी त्यांनां **माधव** ह्मणून कसं ओळखूं व ते तरी मला कसे ओळख देतील. कारण त्यांनीं मला पाहिलं नाहीं व मींही त्यांनां पाहिलं नाहीं. या करतां बाईसाहेब, आपण मला एक विनंतीपत्र देऊन त्यांच्या स्वरूपाच्या कांहीं खुणा सांगीतल्या असतां बरं पडेल.

**कामकंदला**–( हर्षानें ) ( एक विनंतीपत्र. लिहिते व तें दासीजवळ देऊन ) **गिरजा**, हें घे पत्र. आणखीं त्यांच्या स्वरूपाच्या खुणा ह्या आहेत: एकतर स्वरूपा-

नं मदनाहीपेक्षां शतपट चांगले आहेत. सर्वोदीत हास्यमुख, परंतु सांप्रत अपमानानं व माझ्यामुळं कसं असल तें असो, चांपेकळीप्रमाणं नाशिक असून विशाळ भाळ आहे. आजानुबाहू आहेत, कर्दळीच्या गाभ्याप्रमाणं पोटऱ्या असून सर्व कोमल शरीर सडपातळ आहे. पाहशील तेव्हां समजेलच. जा प्रिये लौकर जा आणि प्रियांला लौकर घेऊन ये. तुझी मी फार फार आभारी आहे.

दासी.—फार उत्तम आहे, जाते तर आतां. ( जाते )

कामकंदला.—हो. ( असें म्हणून पलंगावर स्वस्थचित्तें माधवाच्या विवंचनेंत पडते. )

( पडदा पडतो. )

---



## प्रवेश ४ था.

---

स्थळ–देवनगरी बाहेरील–वसंतविलास बाग.

पात्रें.

माधव.....................द्विजपुत्र.
गिरजा....................कामकंदलेची दासी.
विदूषक....................सूत्रधाराचा मित्र.
सूत्रधार... ....... ...नाटकाचार्य.

( तदनंतर विदूषक मोठ्या डौलानें खुर्चीवर बसून सूत्रधाराप्रत बोलतो. )

विदूषक–डियर सूत्रधार, युवार नाटक व्हेरी प्लेझर अस्ती. अतएव फिनिशं ऑर नाहीं, लौकर कहो.

सूत्रधार–( हंसून ) ब्राह्मणा, आणखीं किती भाषा बोलणार ? येवढ्यांतच आटपलेंत ?

विदूषक–नाहीं हो, हमको फारशा भाषा नहीं आत्या, उगीच आमच्या हुक्कीने आम्हास सांगितलें म्हणून आम्ही तितक्यांचा उच्चार केला; नाहीं तर आम्हास फारशी गरज नव्हती. पण कांहो मिसेस, आतांचा तमाशा पाहिलाना तुम्ही ! मग कशी काय गंम्मत ! त्या दोन पाखरांतलें एक पांखरूं तर फारच चांगलें होतें, पण तें आपल्यास काय उपयोगीं ! आतां तें पांखरूं माधवाबरोबर लटपटपंची करणार आणि

आम्ही आपल्या मनांत लुटपुटत राहाणार हें चांगलें नां? आतां आम्ही आपले स्वस्थमानसें करून' निद्राबाईस आमंत्रण देतों म्हणजे झालें.

सूत्रधार–मूर्ख शिरोमणे, फार चावटपणा करूं नकोस. आतां **कामकंदले**ची दासी **माधवा**च्या शोधार्थ निघेल. उभयतांची गांठ पडल्यावर परस्परांचें शहाणपण व चतुरस्त्रपणाचीं भाषणें होतील. समजलास?

विदूषक–हो बाबा समजलों. "मनःपूतंसमाचरेत्. आजकाल विष्णुच्या बापाच्या लेंकाच्या पुत्राचा चार्ज तुम्हीच घेतला आहे. असो, चालुंद्या पुढें पहिले फाडे पढो पंचावन.

(इतक्यांत **माधव** सखेदयुक्त होऊन **वसंतविलास** बागेंत प्रवेश करून म्हणतो.)

माधव–(खेदयुक्त) आतां मात्र माझ्या प्रालब्धाची सीमा झाली! हर हर परमेश्वरा, असा त्यां पाप्यानें तुझा पूर्वजन्मांतरीं अपराध तरीं कोणता केला होता! आतां किती ह्या दासाचा अंत पहाणार! तुला "दयासागर" ह्मणून तुझे प्रेमळभक्त विशेषण देऊन तुझी स्तुती करतात, परंतु तुझी तर मजवर बिलकूल कृपादृष्टी दिसत नाहीं! कृपा असती तर वास्तवीक मी या स्थितीत येऊन माझा व त्या रंभेचा वियोगच झाला नसता!! अहाहा! काय तिच्या स्वरूपाचें वर्णन करूं! मला वाटतें कीं, तिच्या सुंदर स्वरूपास जेवढ्या उपमा सांपडतील, तितक्या सरतेशेवटीं अयोग्यतेसच पात्र होतील!

कारण मुखास पौर्णिमेच्या चंद्राची उपमा देऊं तर त्यास क्षय असून कलंकही आहे ! नाकास जर चांपेकळीची उपमा दिली तर त्या कळीस बहूतकरून साधुसंत अंगिकारून प्रेमभावें विष्णूच्या ठायीं अर्पण करून अंतीं नाकासच मुक्ती पावतात ! परंतु त्या नाकास लुब्ध होऊन अज्ञान मौक्तिकांनीं सुद्धां सागराचा त्याग करून त्याचा अंगिकार केला ! ! तसें मदनमिश्रित सुपक्कगालांस जर गुलाब पुष्पाची उपमा देऊं, तर त्या सुगंधित पुष्पाचा जर भोक्त्यानें उपभोग घेतला तर तें निस्तेज होतें, परंतु ह्या फुलांचा जसजसा भोक्ता उपभोग घेतो तसतसी त्यांस जास्त टवटवी येते ! त्याचप्रमाणें वेणीस जर कृष्णसर्पाची उपमा देऊं तर तो दुरून विनापराध्यास कधीं दंश करील काय ? नाहीं, परंतु ह्या वेणीरूपी कृष्णसर्पाचें माझ्यासारख्या कामीजनांस दर्शन झालें कीं, मदनरूपीं सर्पदंश अंगीं भरून मनुष्य कामोद्रारानें वेडा होतो ! एकूण स्त्रीसारखें रत्नच नाहीं ! जेव्हां तिनें मघां उंच स्वराची तान घेतली, त्यावेळेस त्या तांबूलयुक्त मुखकमलाची तरी किती शोभा दिसत होती ! वास्तवीक इच्यासारखी सुंदरी कोठेंच नसेल ! जेव्हां मी तबलच्यास अंगठा नाहीं ह्मणून सांगितलें तेव्हां ती मजकडे चकित होऊन पाहूं लागली ! अहाहा ! त्यावेळेस तिची दंतपंक्ती पक्क दाळिंबाच्या दाण्याप्रमाणें दिसत होती ! हे सुंदरी, मला तूं मनोभावें करून माळ घालसील काय ? मला तर तुझा आतां घटकाभर वियोग सहन होत नाहीं ! हे हंसगामिनी,

भीच होऊन जर तुझ्या महालीं आलों तर तूं तरी आपल्या मनांत काय समजशील ? कीं पहा, हा किती हलकट मनुष्य आहे तो ! कदाचित् तूं मला एक चकारशद्ब सुद्धां बोलणार नाहींस, परंतु राजाचें शासन कसें तीव्र आहे ! ह्यावेळीं मला काळच प्रतीकूळ आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं ! हे सुंदरी, हे गजगामिनी, मनमोहने, माधवाभिरमणे, तुझा वियोग मला घटकाभर सहन होत नाहीं ! ह्यावेळेस सर्व सामसूम झालेली दिसते तर आपण कोणास न कळतां ह्या **वसंतविलास** बागेंतल्या भयंकर हौदांत प्राण द्यावा म्हणजे परजन्मीं तरी आपण तिला वरूं ! ! दीनदयाल प्रभो, अजून तरी माझी तुला दया येऊंदे रे ! ! (असें म्हणून विलाप करीत करीत हौदाच्या कांठावर बसून आंत उडी टाकणार, इतक्यांत एका वृक्षाआडून मंजूळ ध्वनी निघतो:–

श्लोक.[1]

शिखरिणी.

**कसी तूंतें भ्रांती पडलि भ्रमरारे[2] भ्रमरिची[3] ॥**

---

१ ह्या श्लोकाचे उघडपणें दोन अर्थ होतात. एक अर्थ तर उघड आहे; दुसरा अर्थ दासीनें माधवास कामकंदलेची भेट घेण्यास अन्योक्तिरूपानें सूचविलें आहे. २ माधवा. ३ कामकंदला.

प्रदर्शूनी गूणा प्रित हरियली तूं अलिनिची ॥
तडागाचेठाई करिसि भ्रमरों शोक अतुला ॥
नको अंता पाहूं त्वरित सखया भेट तिजला ॥ )

माधव–( चकित होऊन चहूंकडे पाहतो ) काय चमत्कार आहे? ह्यावेळेस रात्रीचा सुमारें १२ वाजायचा समय आहे. चहूंकडे सामसूम झाली असून ह्यावेळेस सर्व प्राणी निद्रावस्थेंत असतां, ही कोणती स्त्री मजवर अमृत सिंचन करीत आहे बरें? भ्रमर कोण, भ्रमरी कोण, तलावावर माझ्याखेरीज शोक तर दुसरा करणारा कोणीही दिसत नाहीं. तेव्हां अर्थांत ही अन्योक्ती मलाच अनुलक्षून असली पाहिजे यांत संशय नाहीं. अहाहा! अन्योक्तिकलापोतूगारिणही चतुर दिसते. चिंता नाहीं, प्रश्न कोणासही कां अनुलक्षून असेना, उत्तर तर आपणच द्यावें; म्हणजे झालें. ( असें म्हणत आहे तों पुनः दुसऱ्यानें तोच श्लोक ऐकूं येतो. )

शिखरिणी

कसी भ्रांती तूंतें पडलि भ्रमरारे भ्रमरिची ॥
प्रंदर्शूनी गूणा प्रित हरियली तूं अलिनिची ॥
तडागाचेठायीं करिसि भ्रमरा शोक अतुला ॥
नको अंता पाहूं त्वरित सखया भेट तिजला ॥ १ ॥

---

१ दाखवून. २ कामकंदला. ३ तलाव. ४ माधव. ५ फार, तुलना नाहीं ज्यास.

( हा श्लोक ऐकूं येतांच माधव त्याच छंदानुरोधानें साधारणपणें उत्तर देतो. )

७ श्लोक

मनीं आहे इच्छा परि मज असे धाक हरिचा[1] ॥
निशीं अस्ता पाठीं करिल वधगे जाण अमुचा ॥
जरी झाली वार्ता श्रुत दिनकरागे[2] भ्रमरिणी[3] ॥
तरी नाहीं मातें[4] पुनरपि अशा जीवतरणी[5] ॥ २ ॥

( असें म्हणून प्रथमतः ज्या वृक्षाआडून श्लोक ऐकूं आला त्या धोरणानें त्या वृक्षाजवळ उभा राहतो तों दासी एकदम येऊन त्यास नमन करून बोलते )

गिरजा—महाराज, मी आपणास उद्देशून जो अन्योक्तीनं श्लोक म्हटला त्याचें ठीक उत्तर तावडतोब मला मिळालं. ह्यावरून खात्रीपूर्वक वाटतं कीं, आपलं नांव माधव असावं.

माधव—बरं मग?

गिरजा—कृपा करून आपण कामकंदला बाईसाहेबांच्या महालीं चलावं, त्यांनींच आपल्या शोधार्थ मला पाठविलं आहे. चलण्यास आपल्याकडून काडीमात्र हरकत नसावी; कारण मघां ९ वाजल्यापासून जशा ह्मणून राजाकडून गाऊन आल्या, तेव्हां पासून एक

---

१ राजा. २ दिनकररूपीं राजास. ३ अन्योक्तिकलापोद्वारिण. ४ मला. ५ प्राण वाचविण्याची, जीविताची.

सारखा आपल्याकरतां शोक करीत आहेत. तर आतां आपण नाहीं म्हणूंनये.

माधव-( तिचें मन पाहण्याकरतां ) हे स्त्रिये, वेश्या मोठ्या कपटी, दुष्ट, दुराचारी, व कुव्यसनी असतात ह्याकरतां त्यांच्या नादीं कोणीही लागूं नये हेंच उत्तम. त्या पैश्याच्या आशेनें वरून प्रीति दाखवितात आणि तोच आपल्या जवळचा पैसा नाहींसा झाला ह्मणजे त्याचा केंसानें गळा कापल्याखेरीज त्या कधींही राहणार नाहींत, हें पक्कें लक्षांत ठेव. ह्याकरतां "दुरून डोंगर साजरे दिसतात तेच बरे आहेत" जवळ जाऊन कोण्या मूर्खानें फासांत पडावें ?

गिरजा-माधवा, आपण ह्मणतां तें सर्व खरं आहे; परंतु त्या तशा नाहींत. ज्यास आपला ह्मणतील त्या साठीं प्राण देतील समजलांत ? मी शपतपूर्वक आपल्यास वचन देतें कीं, आपल्या केंसास सुद्धां धक्का पोंहचणार नाहीं ( असें म्हणून वचन देते. )—

माधव-( हर्षानें ) हां, मी येतों; परंतु तूं तिची कांहीं मला दाखविण्याकरतां खूण आणली आहेस का ?

गिरजा-( त्याचें मन पहाते ) मी तर ३॥ हाताची खूण आहे ! मग दुसरीचें काय काम आहे ?

माधव- झालें तर मग; आल्या वाटेनें मुकाट्यानें चालली जा. मी कांहीं येत नाहीं ( असें ह्मणून पुनः त्या हौदावर जाऊं लागतो तों दासीं त्याचा पदर धरून ह्मणते. )

गिरजा– हो बाई, त्यांनीं खूण दिली आहे.

माधव–कोठें ती आण पाहूं. (असें ह्मणतांच गिरजा कामकंदलेनें दिलेलें विनंतीपत्र त्याच्या हातीं देते व तें माधव मोठ्या हर्षानें वाचतो:– )

॥ पत्र ॥

स्वस्ति श्री मम प्राणप्रिय माधवराय यांस, वि. वि.

पद.

( माझ्या बाळा रघुवीरा, वनासी जाऊं नको: या चालीवर )

माधवराया तूं मजला, सोडुन जाऊं नको ॥ धृ ॥
विनंतिपत्र, हें यावरी, लक्ष देउन वाचा तरी ॥
गृहीं यावें मम लौकरीं, दासीसवें वेल्हाळा ॥माध.॥ १ ॥
आहे भेटीची मनिं आस, हर्षित करीं ममचित्तास ॥
नच आलां तर या जिवास, हानी होईल जाणपां ॥मा.॥ २ ॥
वेश्या असून पतिव्रता, महानंदेवत मी नाथा ॥
पीता बंधु पर मज आतां, तुह्मावीण सुंदरा ॥ मा. ॥ ३ ॥
शेवटिंल विज्ञप्ती लिहित्यें, मी येत्यें तुज सांगातें ॥
न धरीं संशय न्याया मातें, कामकंदलाभिरामा ॥मा.॥ ४ ॥
माधवराया तूं मजला, सोडुन जाऊं नको ॥ धृ. ॥

### श्लोक.

(कामदा.)

येइगा प्रिया[1] आजि गाऊं रे ॥
हेत गाऊनी प्रीत गाउंरे ॥
पूर्ण बा करीं काम[2] बाहेर ॥
येई बा सख्या[3] तीचे बा हेरें[4] ॥ ३ ॥




### आर्या.

अजुनी नाहीं कोणी, स्पर्शियलें[5] हो मला तुम्ही समजा ॥
कोन्या अमृत कलशा, वरती सखया तुम्हीच हों उमजा ॥ ३ ॥

वरील मजकूर प्रियांच्या लक्ष्यांत आलाच असेल. संद-रहु दासीचा आतां अंत न पाहतां तावडतोब महालीं येण्याची कृपा करावी. कळावें, जास्त आमच्या

---

१ माधवा. २ कामकंदला, अथवा मदन, दोन्हीही अर्थ होऊं शकतात. ३ दासी. ४ जासूद, दूत. ५ अदांत

सारख्या अबलांनी लिहिणें उचित नाहीं, सबब हात आटोपत्यें ही विज्ञप्ति.

आपलें प्रेम इच्छिणारिण,

**कामकंदला.**

माधव–( हर्षानें दासीस म्हणतो ) हे दासी, इच्या म्हणण्यास्तव मी तुझ्याबरोबर चलतों, परंतु मी सूर्योदयापूर्वी पुनरपी येथें येईन. असें जर कबूल असलें तर येतों नाहीं तर–

दासी–त्याविषयीं आपण बिलकुल मनांत आणूं नये. तुमच्या केंसास सुद्धां धक्का पोंचणार नाहीं व सूर्योदयापूर्वीं आपल्यास येथें आणून पोंहचवीन, मग तर झालें ना?

माधव–फार उत्तम आहे चला आतां.

( असें म्हणून उभयतांही गमन करीतात. )

पडदा पडतो.

**प्रवेश ४ था समाप्त.**



## प्रवेश ५ वा.

---

### कामकंदलेचा रंगमहाल.

पात्रें.

माधव ............... द्विजपुत्र.
कामकंदला ......... वेश्या.
गिरजा ................ तिची दासी.
विदूषक .... ......... सूत्रधाराचा मित्र.
कामसेन .............. राजा.
चंद्रचूड ........... प्रधान.

इतर वाजविणारी मंडळी.

(तदनंतर विरहादि दुःखांनीं पीडित झालेली अशी कामकंदला जरतारी पांढरें शुभ्र पातळ नेसून व अंगांत तंग निळी चोळी इत्यादि परिधान करून प्रवेश करिते.)

**कामकंदला**–(आपल्याशींच) काय करावं? दासीची व त्यांची भेट झाली असेल काय? किंवा प्रियानं तर आपल्या जीवास अपमानानं कांहीं करून घेतलं नसेलना? प्राणनाथ एकीकडे व दासी त्यांच्या शोधार्थ भलतीकडे तर गेली नसेलना? बरं, कदाचिंत् दासीची व त्यांची अकस्मात् दैवानं भेट झाली, व तिनं प्रियाजवळ

माझ्याबद्दल गोष्ट काढली असली तर ते तरी माझा अंगिकार करतील काय? अथवा मी वेश्या ह्मणून तर माझा तिरस्कार केला नसेलना? काय मेलं करावं? सर्वच कल्पना मेल्या कशा एकदम मनांत येतात. हर हर, त्याच वेळीं जर मी प्रियाचीं वस्त्रभूषणें घेतलीं नसतीं तर आज हा प्रसंग कां प्राप्त होता? माझीच त्यावेळेस अक्कल कशी गुंग झाली असेल ती असो? परमेश्वरा, किती ह्या कन्येचा आतां अन्त पहाणार? नकोरे देवा असं नको करूं! दयाळा, दासींची व त्यांची गांठ पाडून त्यांना माझा अंगिकार करण्याविषयीं बुद्धी दे! ( श्वास टाकून ) हर हर! दासीस जाऊन तर बाई फार वेळ झाला, अझून कां येत नाहीं कोण जाणं. (डावा डोळा स्फुरण पावतो), शकून तर बाई चांगले होतात; मग काय आहे कोण जाणं. (इतक्यांत मोठ्यानें शब्द होतो) अहो बाईसाहेब, दार उघडाहो लौकर. (असें ऐकूं येतांच **कामकंदला** विद्युल्लतेप्रमाणें झरकन उठून महालाच्या दाराची कडी काढते तों एकदम एक पुरूष तिच्या सन्मुख येऊन उभा राहतो. तें पाहून **कामकंदला** चपापून त्यास त्वेषानें ह्मणत्ये; अरे, तूंरे मेल्या कोण?

**विदूषक**–(हंसून) तुह्माला कोण पाहिजे?

**कामकंदला**–अरे लठ्या, तूंरे ( त्याच्या तोंडाकडे पाहून ) कोण?

**विदूषक**–हो बाई, तोच मी.

**कामकंदला**–मेल्या माझ्याशींरे चावटपणा? इकडे ये पाहूं

सारख्या भाबड्या माणसाची मीं प्रतारणा केली -- वारंवार खोटं बोललों ! कां मला अशी बुद्धि झाली ? कां मी इतका निर्लज्ज झालों ? ( खोटं वाईट वाटून घेतो. )

**मालती :** म्हणजे , कशाबद्दल बोलतांय् तुम्ही ?

**प्रकाश :** काल तुमच्याकडून गेलों आणि रात्रभर तळमळत पडलों. विचार ! सारखा विचार ! ! मालतीबाई , खरं सांगूं ? तुम्हांला पाहिलं आणि तेव्हाच तुम्हीं मला वेड लावलंत ! आंधळ्या प्रेमाच्या नादानं मीं परिस्थितीचा विचार केला नाही ! तुमच्यासारख्या ध्येयवादी मुलीला मी अनुरूप आहें की नाही याचासुद्धा मी विचार करूं शकलों नाही. आंधळेपणानं प्रणयसागरांत उडी मारली आणि मग गटांगळ्या खाऊं लागलों ! तुमच्याशीं विवाह झाला नाही तर माझं आयुष्य बरबाद होईल असं वाटायला लागलं ! सारखं तुमच्या सान्निध्यांत राहावं असं वाटूं लागलं ! आणि मग काल धाडस केलं ! तुमच्यासारखी सुस्वरूप, सुस्वभावी ध्येयवादी मुलगी या कारकुंड्याची बायको शोभणार नाही याचासुद्धा विचार मीं केला नाही !

**मालती :** कारकुनाची बायको ? म्हणजे ?

**प्रकाश :** हो , कारकुंड्याची बायको ! साध्या ६० – ४ – १२० ग्रेडच्या कारकुंड्याची बायको ! तो बंगला – ती मोटार – ती गडगंज इस्टेट— इंजिनियरिंगची परीक्षा —सारं खोटं ! बंगला चुलत्याचा--मोटार चुलत्याची इस्टेट चुलत्याची ! मला वाटलं माझ्यासारख्या कारकुंड्याबरोबर तुम्ही लग्न करायला तयार व्हायच्या नाहींत म्हणून मी खोटं बोललों ! फार घोर पातक केलंय् मीं मालतीबाई – फार घोर पातक ! घरीं गेलों आणि पश्चात्ताप झाला ! वाटलं , तुमची क्षमा मागितली पाहिजे ! केवळ प्रेमासाठी तुमच्यासारख्या साध्वीची मीं प्रतारणा केली ! त्या साध्वीची क्षमा मागितली पाहिजे ! ! मालतीबाई , केवळ त्याचसाठी मी आज आलों आहें. काल मीं तुमच्यापाशीं प्रेमाची याचना केली –आज क्षमेची याचना करतों ! मला तुमचा सहवास नको – मला तुमचं प्रेम नको – मला फक्त क्षमा पाहिजे – क्षमा !

**मालती :** प्रकाश !

**प्रकाश :** तुम्हीं मला नुसतं क्षमा केली म्हणा की मी निघून जातों. तुमचं प्रेम

(असें ह्मणून त्याच्या तोंडांत मारते व विदूषक पळतो).
इतक्यांत

श्लोक

( मधुमाधवी )

जैसें मिळे सुधन तें कृपणा अलभ्य ॥
किंवा पडे मृतमुखीं सुसुधा अलभ्य ॥
जैसे फुलें कमलही अरुणासि लक्षीं ॥
तैसी मिळे विरहिलें गिरजा अलक्षी ॥ १ ॥

गिरजा-(हर्षानें) सरकार, आपल्या पादकमलाप्रत ही भ्रमररूपी दासी लीन होऊन वंदन करत्ये.

कामकंदला-( तिच्या तोंडाकडे पाहून ) कल्याण होवो प्रिये; कां कसं काय? मुखकमल तर प्रफुल्लित दिसतें. मग काय असेल कोण जाणं बाई, परंतु बहुतकरून काम तर सिद्ध झालंसं दिसतं.

गिरजा-(तोंड वाईट करून) कसूचं काय आणि कसचं काय, आहे तें बरंच आहे ! (श्वासोश्वास टाकत्ये).

कामकंदला-(घाबरून) काय काय ? दासी काय ह्मटलंस ? भेट झाली नाहीं ह्मणत्येस ?

गिरजा-नाहीं हो, भेट तर आपल्या वसंतविलास

---

१ उत्तम. २ सूर्यास. ३ पाहून. ४ कामकंदलेस. ५ अकस्मात्.

बागेतच झाली, परंतु त्यांनीं आपणा उभयतांचाही निषेध करून ग्रामांतरीं गमन केलें.

कामकंदला–(गहिंवरून डोळ्यांत आंसवें आणून म्हणत्ये) हा चांडाळणी! हातचा हिरा गमावलास ग गमावलास! (तीस ढकलून) जा; कर इथून काळं एकदाचं. मेली शहाणपणाचा तोरा तर मोठी मारीत असे; हा शहाणपणाचा लखलखीत उजेड पाडला काय? व: काय तुझी गोष्ट? [भूमीवर पतन होऊन] शिव शिव हे शंकरा, किती ह्या कन्येचा अंत पहाणार? पृथ्वीनायका, असा म्यां तुझा कोणता अपराध केला कीं जेणेंकरून माझा व्यर्थ छळ करतोस? [रडूं लागत्ये] शिव शिव माधवा!! किती ह्या दासीचा आतां अंत पहाणार? असो, तुझी मर्जी. [किंचित् मूर्छित होत्ये तों माधव प्रवेश करतो आणि तिजजवळ जाऊन लवून म्हणतो.]

माधव–हे कामकंदले, सावध हो, सावध हो; ज्याच्या प्राप्तीकारितां तूं हट्ट घेऊन ह्या स्थितीस पोंहचलीस, तो प्रत्यक्षपणें तुझ्याशीं सदेह बोलत असतांनाही किमर्थ, प्रिये, मौन्य धारण केलेंस? चल उठ आणि एकवेळ माझ्याकडे प्रेमदृष्टीनें अवलोकन कर. [ चंद्राननरूपी अशा ओळखीच्या शब्दांचें, सागररूपी कामकंदलेच्या श्रवणांस दिग्दर्शन होतांच नेत्रांतून, [ त्याकडे हळूच अवलोकन करतांच ] प्रेमानें लहररूपी अश्रू वाहूं लागले व लाजून तशीच विद्युलते

प्रमाणें झरकन उठते व दूर खालीं मान घालून उभी राहते. ]

माधव—कां प्रिये, आतां किती लाजायचं ! हां, मी समजलों, माझेवर रागावूं नकोस ! ये, जवळ ये ! दूर कां उभी ?

कामकंदला-[ खालीं पाहून ] माझ्या पत्रास मान देऊन मुखांतून येवढे तरी गोड शब्द निघाले, हें माझें मोठें भाग्यच समजलें पाहिजे !

माधव—आतां तें कांहीं काढूं नकोस, मी अपराधी आहें खरा, क्षमा कर.

कामकंदला—अग बाई ! हें काय तरी ! ( असें ह्मणून माधवाच्या गळ्यांत मिठी मारते व उभयतां पलंगावर बसतात.) अपराध कशाचा ? आणि आहे तरी काय ?

माधव—कांहीं नाहीं प्रिये, मघां मी तुझें मन पहाण्या करतां तुला ह्या दासीद्वारें तसदी दिली. पण तूं भोळ्या मनाची खरी. दासीनें 'मी ग्रामांतरीं गेलों' व 'तुह्मा उभयतांचा निषेध केला' असें सांगतांच तूं तिची पूजा करून फारच शोक करूं लागलीस व अंतीं शिव शिव माधवा, आतां किती या दासीचा आपण अंत पहाणार ? बरं तुझी मर्जी !' असें ह्मणून सूर्यास्तानंतर जसें कमल कोमेजून जातें तद्वत तूं माझ्या अट्टाहास्येंकरून भूमिप्रत पतन पावलीस ! [ गाहिंवरून तिची हनुवटी धरतो ] अहाहा ! प्रिये त्यावेळेस मला जें वाईट वाटलें असेल तें मीच जाणें ! असो.

कामकंदला—अहाहा ! प्रिया, आपण केलंत तें ठीकच केलं.

कारण वेश्या म्हणून जितक्या आहेत तितक्या सर्व पैशाच्या भुकेल्या असतात; व तोच पैसा त्याजजवळचा नाहींसा झाला म्हणजे मग मात्र तो कोण व ही कोण ! तद्वत मी आहे कीं काय याची आपण परीक्षा घेतलीत. बरं केलंत.

गिरजा–[माधवाकडे पाहून] सरकार, माझी मेलीची अधाऱ्या मधीच पुष्पांजली झाली. बरं तेंही असो, पण जसें म्हणून आपण आलांत, आपल्याला येऊन एक तास झाला, बाईसाहेब एक चकारशब्द सुद्धां माझ्याशीं बोलल्या नाहींत. बरोबरच आहे "गरज सरो आणि वैद्य मरो" ही जी म्हण आहे ती कांहीं खोटी नाहीं.

कामकंदला–आतां तूं किती टोले देणार ? घटकाभर बोललं नाहीं म्हणून गरज पूर्ण झाली काय ? बरोबर आहे, तुम्ही थट्टा करून टोले न दिले तर मग आणखीं दुसर कोण देणार ? झाला खरा अपराध, बाई क्षमा कर.

माधव–[ कामकंदलेची हनुवटी धरून ] हं हं प्रिये, थट्टा करतां करतां तुम्ही उभयतां भांडण्यास लागलां कीं काय ?

गिरजा–नाहीं हो. भांडण थोडेंच आहे.

कामकंदला–[ हास्यमुख करून ] सख्या, हें घ्या [ असें म्हणून त्याच्या मुखकमलीं विडा घालते. ]

माधव–[ करद्वयांत दोन तांबूल घेऊन ] प्रिये, हे दासी, तुम्हीही माझ्या गरीबाच्या हातचा तांबूल प्रेमानें भक्षण करावा. [ दोघी तसें करतांच कामकंदला गिरजेस

[ दासीस ] बाजूविं... ...रून येण्याची नेत्रसंकेतैंकरून खूण क... ...काटयाने उठून जाऊं लागत्ये इतक्यांत ता... ...
कां, कुठें चालली आपली स्वारी ?

गिरजा—बाहेर थोडेसें काम आहे. तें करून मी ...
[ जात्ये ].

कामकंदला—[ आणखीं एक तांबूल देत्ये. ] जिवलगा, ह्या अभागणी वेश्येसाठीं आपला भर राजसभेंत अपमान होऊन आपल्यास फारच कष्ट झाले असतील, नाहीं बरें ? माझीच त्यावेळेस अक्कल कशी गुंग झाली असेल ती असो, परंतु जोंपर्यंत [ त्याच्या हृदयावर हस्त ठेवून ] हें नाथरूपी द्रव्य ह्या कृपणीला मिळालें नव्हतें तोंपर्यंत "आपला तो राजसभेंत झालेला अपमान" व वनांत ह्या निर्दयीसाठीं आपल्यास जे जे कष्ट झाले असतील ते ते मला मूर्तिमंत दृष्टीभूत होऊन जें कांहीं दुःख होऊन मीं आपणाकरितां विलाप केला असेल तो, प्रिया, माझी प्रिय दासी गिरजाच जाणत आहे. ती होती, म्हणूनच हें चरण-कमल ह्या भ्रमरीस प्राप्त झालें !! नाहीं तर सख्या, पुढचा प्रसंग भयंकरच होता !! अस्तू [ श्वासोश्वास टाकून ] कांहीं असो, हे अलभ्य चरण व ही सकुमार मदनमूर्ती अवलोकन करून त्या अनिर्वाच्य दुःखाचा विसर पडून ह्यावेळेस जो कांहीं माझ्या मनांत हर्ष झाला आहे, तो, सख्या, अवर्णनीय होय !!!

माधव—[ हनुवटीस हात लाऊन ] लावण्यकलिके,

वास्तविक पहातां हा सर्व प्रताप तुझ्या दासीचा आहे. शाबास त्या दासीची. दासी असावी तर अशीच चतूर व शहाणी असावी. प्रिये, मी तुजकरतां, 'त्या चांडाळ राजास, ' तूं अल्पकालांत मृत्यू पावशील ' असा शाप देऊन मनांत बेत केला कीं, आतां ह्या गावांत राहूं नये, परंतु मजजवळ वस्त्रपावर्ण नसल्याकारणानें सर्वप्रसिद्ध **वसंतविलास** बागेत रातचेरात्र राहून प्रातःकाळीं मुकाट्यानें उठून ग्रामांतरीं चालतें व्हावें, असा विचार करून सुमारें रात्रीं ९ वाजण्याच्या सुमारास स्वस्थ पडलों तों तुझी मूर्ति माझ्या डोळ्यांसमोर दिसूं लागली! अहाहा! सखे, मला थंडीवाऱ्याचें भय न वाटतां तुझ्या विरहानें इतकें दुःख झालें कीं, हें कामतप्त कलेवर बागेतल्या सरोवरांत फेंकून द्यावें असें वाटलें, व त्याप्रमाणें जों सरोवरांत उडी टाकणार तों ह्या रामरूपी दासीनें अन्योक्ति रूपीं बाण टाकतांच विरहरूपीं दशाननाचा वध होऊन माझें मन स्थीर झालें; आणि मींही तीस तसेंच उत्तर दिलें तों दासीनें तुझें पत्र दिलें, म्हणून मी येथें प्राप्त होऊन तुझी भेट झाली! एकंदरींत शाबास दासीची. बरें!! [ इतक्यांत दासी सर्व वाजविणाऱ्यांसह प्रवेश करिते. ]

गिरजा—( हंसून ) कसा काय विनोद चालला आहे! सर्वं ठीक ठाक आहेना? ( घड्याळाकडे पाहून ) अजून २ वाजण्यास अवकाश आहे पण!

कामकंदला–बस मेले उगीच. थट्टा केल्यावांचून कांहीं इला सुचतच नाहीं.

माधव–( वाजंत्र्यांकडे पाहून ) प्राणसखे, बरें, तें असूंदे, परंतु हें काय ?

कामकंदला–( अंमळ दूर बसून ) कांहीं नाहीं, यांना वाजविण्याकरतां दासीनं बोलावलं असेल, दुसरं काय?

माधव–( दासीकडे पाहून ) हो कांग ?

दासी–हो, सरकार. मींच यानां वाजविण्याकरतां बोलावलं आहे, आणखीं, बाईसाहेबांस आपलं गाणं ऐकण्याची फार उत्कंठा आहे.

माधव–( हंसून ) आपण तर पहिल्यानें गाणार नाहीं. ज्यानें इतका द्राविडिप्राणायाम केला तोच पहिल्यानें गाईल. नंतर मी मग थोडेंसें गाईन.

कामकंदला–( दासी व माधवाकडे हंसून पाहून ) दासी, येवढेंचंना ? ( वाजंत्र्यांस ) धरारे चांगला ताल सूर, ( गाऊं लागते ).

तराना.

तानों, तधेंना, तनन दिर दिर तानों, ॥ तनदरना दीम दीम ताता दिमतन दरना, तन दर तधेन्ना, दीम तन दीम, तदीम तो तॅ तॅ, तारि तर दान्नीं, ॥तानों०॥नादर दर दान्नी, तुंदरदर दान्नी, तननन, तन दरन दीम, तादीम, तानों, तन दरन्ना, त-दीम दीम दीम तॅनॉ, दीम तन दरन्ना, धिक्किट् धिक्किट् तक, नगधिग, धुमकिट, तघ्धिडनू, धुमकिट्ट तक्र धिद धिन ॥ तानों ॥ १ ॥

माधव–( मनांत ) शाबास प्रिये शाबास. धन्य तुझा कंठ! असें गाणें, व अशी रंभा मी आजन्मांत पाहिली नसेल! धन्य एकुण विधात्याची! मला वाटतें त्यानें आपली, ह्या प्रियेच्या सुकुमार मूर्तीस घडण्याकरितां सर्व अक्कल खर्च केली असावी. इच्या सुंदर स्वरूपास तर काय, परंतु गाण्यामध्यें सुद्धां कोणाच्यानें इच्याशीं तुलना करवणार नाहीं! काय गोष्ट! आतांच उंच स्वराची तान घेतांच सर्व शरीराचे अवयव कसे तप्त होऊन कोपाविष्टसे भासूं लागले! किती आतां स्वरूपाचें वर्णन करावें! वास्तवीक इच्या स्वरूपास उदाहरणांची तुलना केल्यास एक लहानसा ग्रंथच होईल! काय तें स्वरूप! काय तो आवाज! गातां गातां नेत्रबाण तरी कसे चतुरतेनें मारून माधवाचें काळीज ( मन ) मदनरूपी रणभूमीप्रत पाडलें! एकूण हे तरुणी, धन्य तूं. व माझ्यासारखा धन्यही आतां ह्या लोकीं कोणी नसेल! कारण कीं, ही अप्रतीम मदनानें लसलसीत असी सुंदर पुतळी आयास न करतां अनायासें प्राप्त झाली! आतां ह्या सकुमारीपुढें मी तरी काय गाणार?

गिरजा–[ हंसून ] कां सरकार! आतां होउंद्या एकदां. [कामकंदलेकडे पाहून] कांहो बाईसाहेब, मनीं असतें तेंच कपाळीं येतें.

माधव–[ तिच्या खुबीदार भाषणानें हंसून ] बरें तर, दासीच्या ह्मणण्यास्तव आतां गातोंच तर.

कामकंदला–[ दासीकडे पाहून ] दासी, केवढं पण ओझं पडलं आहे!

AWARDED BY THE DAKSHINA PRIZE COMMITTEE.

# बिल्वकनाथ.

## (एक वैरागी)

हें नाट

विद्याधर वामन भिडे, बी. ए.

अहमदनगर हायस्कुलांतील असिस्टंट मास्तर

आणि

इसापनीतीच्या पद्यात्मक भाषांतराचे कर्ते

ह्यांनीं केलें

तें

मुंबई येथें

'नेटिव ओपिनियन' छापखान्यांत छापिलें.

इसवी सन १८८८.



किंमत ८ आणे, ट. हा. १ आणा.

(पुस्तकें ग्रंथकर्त्याकडे विकत मिळतील.)